सन २०२४-२५ करिता निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास (२४०६ २२९५) या राज्य योजनेअंतर्गत निधी वितरित करण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग,**
**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.६३/फ-९**
**मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- ३१ मार्च, २०२५**

वाचा :-

१. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३, दि. १.४.२०२४
२. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. २५.०७.२०२४
३. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. १२.०२.२०२५
४. वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२४/प्र.क्र.८०/अर्थ-३, दि. १७.०३.२०२५
५. महसुल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.४४/ फ-९, दि.०९.०५.२०२४
६. महसुल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.६३/भाग-१/फ-९, दि.०७.०८.२०२४
७. महसुल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.६३/भाग-१/फ-९, दि.१३.०८.२०२४
८. महसुल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.६३/भाग-१/फ-९, दि.११.०९.२०२४
९. महसुल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.६३/भाग-१/फ-९, दि.१४.१०.२०२४
१०. महसुल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.४४/फ-९, दि.२०.०९.२०२४
११. महसुल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.४४/फ-९, दि.२५.१०.२०२४
१२. महसुल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.४४/फ-९, दि.१३.१२.२०२४
१३. महसुल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.६३/ फ-९, दि.२३.०१.२०२५
१४. महसुल व वन विभाग, शासन शुध्दीपत्रक क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.६३/फ-९, दि.३०.०१.२०२५
१५. महसुल व वन विभाग, शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.६३/फ-९, दि.१७.०२.२०२५
१६. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२८/५२५/२०२४-२५, दिनांक २७.०८.२०२४
१७. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२०/५७/२०२४-२५, दिनांक १०.०९.२०२४
१८. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२०/२२/२०२४-२५, दिनांक ११.१०.२०२४
१९. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२०/९७७/२०२४-२५, दिनांक २२.०१.२०२५
२०. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२०/१०४४/२०२४-२५, दिनांक १०.०२.२०२५
२१. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२०/५७/२०२४-२५, दिनांक १०.०९.२०२४
२२. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२०/१०६१/२०२४-२५, दिनांक १४.०२.२०२५
२३. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२०/१११८/२०२४-२५, दिनांक २८.०२.२०२५

२४. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२०/११७७/२०२४-२५, दिनांक ११.०३.२०२५
२५. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२०/११७९/२०२४-२५, दिनांक १२.०३.२०२५
२६. अपर प्रधान मुख्य वनसरंक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र.कक्ष- १/पी/यो/चाबाप्र/प्र.क्र.२०/१२१२/२०२४-२५, दिनांक १९.०३.२०२५

**प्रस्तावना :-**

सन २०२४-२५ करिता निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास (२४०६ २२९५) या लेखाशिर्षांतर्गत वित्तीय वर्ष सन २०२४-२५ करिता निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास (२४०६-२२९५) या लेखाशिर्षांतर्गत सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत रुपये २३४०५.७० लक्ष नियतव्यय मंजूर व अर्थसंकल्पीत आहे. त्यानुषंगाने वाचा क्र.५ ते १५ येथील नमूद शासन निर्णयान्वये सदर लेखाशिर्षांतर्गत एकूण रु.१९८२२.२० लक्ष इतके अनुदान वितरित करण्यात आले आहे.

वाचा क्र.४ येथील नमूद वित्त विभागाच्या दिनांक १७.०३.२०२५ रोजीच्या परिपत्रकान्वये सन २०२४-२५ आर्थिक वर्षाच्या उर्वरित कालावधीसाठी अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत तरतूदींचा उर्वरित संपूर्ण निधी एकत्रितरित्या बीम्स प्रणालीवर सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत १००% इतका उपलब्ध करुन देण्यात आला आहे. तसेच सदर परिपत्रकातील परिच्छेद क्र.३ मधील (ब) नुसार उर्वरित उद्दिष्टांमधील कार्यक्रमांतर्गत खर्चाचा निधी वितरणासाठी नियोजन विभाग व वित्त विभागाची आणि अनिवार्य खर्चाच्या निधी वितरणासाठी वित्त विभागाची मान्यता घेण्यात यावी अशा सूचना देण्यात आल्या आहेत.

वित्त विभागाचे वाचा क्र.१ ते ४ येथील नमूद परिपत्रकानुसार सदर योजनेअंतर्गत अर्थसंकल्पित असलेल्या नियतव्ययाच्या अनुषंगाने अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांच्या वाचा क्र. १६ ते २६ येथील नमूद पत्रान्वये प्राप्त झालेल्या प्रस्तावांतर्गत केलेली मागणी विचारात घेऊन निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास (२४०६ २२९५) या लेखाशिर्षांतर्गत BDS प्रणालीवर अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती.

**शासन निर्णय :-**

अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प, नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचेकडून वाचा क्र. १६ ते २६ येथील नमूद पत्रांन्वये प्राप्त झालेले प्रस्ताव व वित्त विभागाचे वाचा क्र.१ ते ४ येथील नमूद परिपत्रकानुसार बीम्स प्रणालीवर सुधारीत अंदाजाच्या मर्यादेत उपलब्ध निधी विचारात घेता, प्रस्तावांतर्गत मागणी लक्षात घेऊन सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात निसर्ग पर्यटन स्थळाचा विकास (२४०६ २२९५) या योजनेमधून सदर शासन निर्णयासोबतच्या **"प्रपत्र-अ"** मधील तक्त्यात दर्शविण्यात आलेल्या निसर्ग पर्यटन स्थळाकरीता ०२- मजुरी अंतर्गत रु.१६२.५० लक्ष, २७-लहान बांधकामे अंतर्गत रु.४५२.०८ लक्ष व ५०-इतर खर्च अंतर्गत रु.५११.७९ लक्ष असा उपशिर्षनिहाय एकूण रु. ११२६.३७ लक्ष इतका निधी खालील अटींच्या अधिन राहून वितरित व खर्च करण्यास मान्यता प्रदान करण्यात येत आहे:-

१. सदर निधीसाठी नियंत्रक अधिकारी म्हणून अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर हे राहतील. त्यांच्याकडे हा निधी सुपूर्द करण्यात येत आहे. या योजनेंतर्गत घ्यावयाच्या कामाची अंमलबजावणी कृती आराखडयाप्रमाणे, विहित कार्यपध्दतीनुसार आणि ठरविलेल्या मुदतीत करण्याबाबत दक्षता घ्यावी. याबाबत सविस्तर मार्गदर्शक सूचना क्षेत्रीय

अधिकाऱ्यांना द्याव्यात आणि अंमलबजावणीबाबत वेळोवेळी आढावा घ्यावा. मंजूर निधीपेक्षा जास्त खर्च होणार नाही याची नियंत्रक अधिकाऱ्यांनी दक्षता घ्यावी.

२. उपरोक्त खर्च विहीत कार्यपध्दतीनुसार तसेच अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध मासिक निधी प्रवाहानुसार खर्च करण्यात यावा. यामध्ये कोणतीही वित्तीय अनियमितता होणार नाही याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर योजनांतर्गत वाचा क्र. १६ ते २६ येथील नमूद पत्रान्वये सादर केलेल्या प्रस्तावातील वनवृत्ताच्या प्रपत्र-ब मध्ये प्रस्तावित केलेल्या कार्यबाबींना आवश्यकतेनुसार सक्षम प्राधिकाऱ्यांनी तांत्रिक व प्रशासकीय मान्यता प्रदान केलेली आहे याची खातरजमा झाल्यानंतरच उपशिर्षनिहाय सदर कार्यबाबींवर निधी खर्ची टाकण्यात यावा.

४. सदर मंजूर कामामध्ये द्विरुक्ती होणार नाही आणि मंजूर कामांव्यतिरिक्त कोणत्याही नवीन बाबीवर /नवीन क्षेत्रावर/ नवीन कामांवर खर्च करण्यात येणार नाही तसेच कामात कोणतीही अनियमितता होणार नाही याची दक्षता घ्यावी.

५. प्रस्तावित कामांमध्ये निसर्गपुरक असलेले साहित्याचा जास्तीत जास्त वापर करावा.

६. नियंत्रक अधिकाऱ्यांना सूचित करण्यात येते की, एकूण वितरीत केलेल्या/करण्यात येणाऱ्या तरतूदीपेक्षा कोणत्याही परिस्थितीत अतिरिक्त खर्च होणार नाही, याची दक्षता घ्यावी.

७. सदर तरतूद खर्च करतांना वित्त विभागाने वेळोवेळी घालून दिलेल्या अटी व शर्तीचे पालन करावे.

८. अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध असलेला निधी कोषागारातून आहरीत करण्यापूर्वी तसेच खर्च करताना राज्य शासनाची कार्य नियमावली, वित्तीय नियमावली, अर्थसंकल्पीय नियम पुस्तिकेतील तरतूदी व सर्व अटी/शर्तीचे पालन करावे.

९. सदर आर्थिक वर्ष २०२४-२५ मध्ये मंजूर व वितरीत अनुदानाच्या मर्यादेत खर्च सिमीत ठेवावा.

१०. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान संबंधित कोषागारातून काढून घेतल्यानंतर काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शिर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र शासनास सादर करावे.

११. संस्थेने मागील वर्षाकरिता त्यांनी उपलब्ध करुन दिलेल्या अनुदानाच्या विनियोगाबाबतचे प्रमाणपत्र शासनास तसेच महालेखापालांना तात्काळ सादर करावे. त्याचप्रमाणे, आता वितरित करण्यात येत असलेल्या अनुदानाचे तपशिलवार देयक व विनियोग प्रमाणपत्र देखिल (Utilization Certificate) महालेखापाल, लेखा परिक्षा, महाराष्ट्र-२ नागपूर व शासनाला तातडीने सादर करावे.

१२. उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहतील व त्याकरीता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

१३. सदर खर्च वित्त विभागाच्या दिनांक ०१.०४.२०२४, २५.०७.२०२४ ,१२.०२.२०२५ व १७.०३.२०२५ रोजीचे परिपत्रकातील अटींची पूर्तता होईल, याची दक्षता घेण्यात यावी.

१४. सदर मंजूरीस शासन निर्णय क्रमांक एमएससी- २०११/प्र.क्र. १७८/फ-५, दिनांक ३०.९.२०११ च्या परिशिष्टात नमुद केलेल्या अटी व शर्ती बंधनकारक असतील.

१५. सदरहू कामे करतांना वन (संवर्धन) कायदा १९८० मधील तरतुदींचा भंग होणार नाही तसेच सर्वोच्च न्यायालय/उच्च न्यायालय/केंद्र शासनाच्या व्याघ्र संवर्धन प्राधिकरण यांनी दिलेल्या मार्गदर्शक सुचना/आदेशाची अवहेलना होणार नाही, याची सुध्दा दक्षता घ्यावी.

१६. केंद्र शासन व राज्य शासनाचे निसर्ग पर्यटन धोरणाशी अनुकूल राहतील अशीच कामे कार्यान्वित करावी.

१७. शासन निर्णय दिनांक ०१ डिसेंबर, २०१६ नियम पुस्तिकेत नमुद केल्यानुसार तसेच उद्योग उर्जा व कामगार विभाग, शासन निर्णय दिनांक २४ ऑगस्ट, २०१७ मध्ये नमूद गव्हर्नमेंट ई-मार्केटप्लेस (GeM) पोर्टलच्या कार्यपध्दतीनुसार निविदा प्रक्रियेत ई-निविदा प्रणालीचा वापर करावा.

१८. कामांची अंमलबजावणी करताना कामांचे एकत्रीकरण करुन नियमानुसार ई-निविदा प्रणाली अवलंबण्याची दक्षता घ्यावी.

उपरोक्त खर्च मागणी क्रमांक-सी-०७ प्रधान शिर्ष- २४०६, वनिकरण व वन्यजीवन, पंचवार्षिक योजनांतर्गत, राज्य योजनांतर्गत योजना (०२) (०६) इको टुरिझम (राज्य) (२४०६-२२९५) या लेखाशिर्षांतर्गत सन २०२४-२५ या वित्तीय वर्षात उपलब्ध असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या सहमतीने व वित्त विभागाच्या अनौ.क्र.१६३/व्यय-१०, दि.२६.०३.२०२५ अन्वये तसेच वित्त विभाग दिनांक ०१.०४.२०२४, २५.०७.२०२४, १२.०२.२०२५ व १७.०३.२०२५ रोजीचे परिपत्रक आणि वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र.विअप्र/२०१३/प्र.क्र.३०/ २०१३/ विनियम, भाग-२, दिनांक १७.४.२०१५ अन्वये विभागास प्रदान करण्यात आलेल्या अधिकारास अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३३११२१८०२६२१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MADHAV ASHOK BANTEWAD

Digitally signed by MADHAV ASHOK BANTEWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT,
2.5.4.20=0d181aa39b4d21e44d471606b7df670cbc65b3cb8d80b1ca27929265161d139a, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=1B720BC879C4DDAC69D0E7FC911BFC2A93205010890D544AFB10419754DA2525, cn=MADHAV ASHOK BANTEWAD
Date: 2025.03.31 12:19:33 +05'30'

**(माधव अ. बंटेवाड)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत :-**

१. प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
२. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (अर्थसंकल्प,नियोजन व विकास), महाराष्ट्र राज्य, नागपूर
३. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पूर्व नागपूर
४. अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव) पश्चिम मुंबई
५. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र निसर्ग पर्यटन विकास मंडळ, नागपूर
६. मुख्य वनसंरक्षक (प्रा.), चंद्रपूर, ठाणे, पुणे
७. वनसंरक्षक (प्रा.), छत्रपती संभाजीनगर, यवतमाळ
८. महालेखापाल-१/२ (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य, मुंबई / नागपूर
९. सह सचिव/उपसचिव,वित्त विभाग (अर्थ-३)/(व्यय-१०), मंत्रालय, मुंबई-३२
१०. उप सचिव, नियोजन विभाग (का-१४७५), मंत्रालय, मुंबई-३२
११. कार्यासन अधिकारी, फ-२/ब-१ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१२. निवडनस्ती.

**शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०२४/प्र.क्र.६३/फ-९,दिनांक:- ३१ मार्च, २०२५**

**सोबतचे "प्रपत्र - अ"**

| अ. क्र. | नियंत्रण अधिकारी | निसर्ग पर्यटन स्थळाचे नाव | या शासन निर्णयान्वये वितरीत करावयाची एकूण रक्कम रु.लक्ष | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | ०२-मजूरी | २७ लहान बांधकामे | ५०-इतर खर्च | एकूण |
| १ | मुख्य वनसंरक्षक (प्रा.) चंद्रपूर | जोगापूर-राजूरा जंगल सफारी | ०.०० | ९९.३१ | ०.०० | ९९.३१ |
| २ | अप्रमुवसं (वजी) पुर्व नागपूर | ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प (बफर) | ०.०० | ३८.३३ | ०.०० | ३८.३३ |
| ३ | | ताडोबा-अंधारी व्याघ्र प्रकल्प (बफर) | ०.०० | १५९.८८ | ५०.१२ | २१०.०० |
| ४ | मुख्य वनसंरक्षक (प्रा.),ठाणे | मौ.जामगाव येथे डॉ.चिंतमणराव देशमुख जैवविविधता वन व वनस्पती उद्यान | ०.०० | ०.०० | ३७.५९ | ३७.५९ |
| ५ | अप्रमुवसं (वजी) पुर्व नागपूर | बोर व्याघ्र प्रकल्प, वर्धा | ०.०० | ७४.०० | १५६.०० | २३०.०० |
| ६ | | पेंच व्याघ्र प्रकल्प, नागपूर | ०.०० | ६७.४३ | २६.९९ | ९४.४२ |
| ७ | अप्रमुवसं (वजी) पश्चिम मुंबई | कळसुबाई हरिचंद्रगड अभयारण्य | २४.१९ | ०.०० | ३०.४२ | ५४.६१ |
| ८ | मुख्य वनसंरक्षक (प्रा.), चंद्रपूर | मौजे सादागड (रिंगदेव) येथे पर्यटन सफारी | ०.०० | ०.०० | ६०.०० | ६०.०० |
| ९ | वनसंरक्षक (प्रा.) छ.संभाजीनगर | मौजे घुंगराळा तलबिड ता.नायगाव खै. जि. नांदेड कक्ष क्र.५७६ A | १८.६८ | १३.१३ | ३३.५३ | ६५.३४ |
| १० | मुख्य वनसंरक्षक (प्रा.) चंद्रपूर | कारवा जंगल सफारी, मध्य चांदा | २४.३० | ०.०० | ०.०० | २४.३० |
| ११ | मुख्य वनसंरक्षक (प्रा.) छ.संभाजीनगर | मौजे कोहळी, ता.हदगांव, जि.नांदेड कक्ष क्र. ४९८ B | २५.०० | ०.०० | ०.०० | २५.०० |
| १२ | मुख्य वनसंरक्षक (प्रा.) छ.संभाजीनगर | मौजे पळसा ता.हदगांव, जि.नांदेड कक्ष क्र. ४९८ B | २०.०९ | ०.०० | ३९.९१ | ६०.०० |
| १३ | वनसंरक्षक (प्रा.) यवतमाळ | मौजे शिवपुरी ता.हदगांव, जि.नांदेड कक्ष क्र. ४९८ B | २५.०० | ०.०० | ०.०० | २५.०० |
| १४ | | मौजे पांढरदेवी, ता.मारेगाव | २५.२४ | ०.०० | ०.०० | २५.२४ |
| १५ | मुख्य वनसंरक्षक (प्रा.) पुणे | मौ.पाटस मस्तानी तलाव | ०.०० | ०.०० | ७७.२३ | ७७.२३ |
| | | **एकूण:-** | **१६२.५** | **४५२.०८** | **५११.७९** | **११२६.३७** |

MADHAV ASHOK BANTEWAD

Digitally signed by MADHAV ASHOK BANTEWAD
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, 2.5.4.20=0d181aa39b4d21e44d471606b7df670cbc65b3cb8d80b1ca27929265161d139a, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1B720BC879C4DDAC69D0E7FC911BFC2A93205010890D544AFB10419754DA2525, cn=MADHAV ASHOK BANTEWAD
Date: 2025.03.31 12:19:54 +05'30'

**(माधव अ. बंटेवाड)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**